अकोला शहर पो.स्टे., जि. अकोला येथील गु.र.क्र. २२५/२०१९ या गुन्हयातून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणामध्ये मा. सत्र न्यायालय, अकोला येथे शासनाच्यावतीने न्यायालयीन कामकाज हाताळण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त ॲड. श्री. उज्ज्वल निकम यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- एसपीपी-०६१९/प्र.क्र. २०९/पोल-१०,**

गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादम कामा मार्ग,
मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ:-१) शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-०११९/यू.ओ.आर.४५/डी-१४, दिनांक ०६.०९.२०१९

**प्रस्तावना:-**

अकोला शहर पो.स्टे., जि. अकोला येथील गु.र.क्र. २२५/२०१९ या गुन्हयातून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणामध्ये मा. सत्र न्यायालय, अकोला या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्यावतीने हाताळण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. उज्ज्वल निकम यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अकोला शहर पो.स्टे., जि. अकोला येथील गु.र.क्र. २२५/२०१९ या गुन्हयातून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणामध्ये मा. सत्र न्यायालय, अकोला या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. उज्ज्वल निकम यांना, सदरहू अकोला शहर पो.स्टे., जि. अकोला येथील गु.र.क्र. २२५/२०१९ या गुन्हयामधून उद्भवलेले न्याय प्रकरण निकाली निघेपर्यंत, प्रतिदिन परिणामकारक सुनावणीकरीता खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - | रू. ५०,०००/- (रुपये पन्नास हजार फक्त) |
| २) विचारविनिमय फी (प्रतितास)<br>(कमाल मर्यादा प्रतिदिन रू. ५०,०००/-) | - | रू. १५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त) |
| ३) हॉटेल लॉजिंग बोर्डिंग (प्रतिदिन) | - | रु. ५,०००/- (रुपये पाच हजार फक्त) |
| ४) प्रवास खर्च | - | विमान प्रवासासह प्रत्यक्ष प्रवास खर्च (At Actual) |

तसेच सदर व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. श्री. उज्ज्वल निकम यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता व्यावसायिक फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. ॲड. श्री. उज्ज्वल निकम यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान सदरचे न्याय प्रकरण निकाली निघाल्यावर करण्यात यावे. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय तपास अधिकारी/पोलीस उप अधीक्षक दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. उज्ज्वल निकम यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उप अधीक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्रमांक " मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा " या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. ३५१३/२०/व्यय-७, दि. २४.०९.२०२० अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२०१०२११५३७५२५८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.21 15:39:23 +05'30'

**( किशोर भालेराव )**
**उप सचिव (विधि), गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. विशेष पोलिस महानिरीक्षक, अमरावती परिक्षेत्र, अमरावती.
३. पोलीस अधीक्षक, अकोला.
४. पोलीस उप अधीक्षक, अकोला शहर पोलीस स्टेशन, सिव्हिल लाईन , अकोला.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र -२, नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.

७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, अकोला.
८. ॲड. श्री. उज्ज्वल निकम, बॅरीस्टर निकम चौक,४८, रामदास कॉलनी, जळगाव-४२५ ००१.
९. कार्यासन अधिकारी, कार्यासन-१४,पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी,विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग/व्यय-७, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती- पोल-१०.